**जिगाव प्रकल्प, ता. नांदुरा, जि. बुलडाणा या प्रकल्पाच्या रु.१७१०.८४ कोटी इतक्या रक्कमेच्या अधिक्य टिप्पणीस मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/११९९/प्र.क्र.३६९/मोप्र-२**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.
दिनांक : १०जुलै, २०२३.

**प्रस्तावना :-**

जिगांव प्रकल्प हा विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपुर अंतर्गत बुलडाणा जिल्ह्यातील नांदुरा तालुक्यातील जिगांव -टाकळी गावाजवळ तापी खोऱ्याच्या पुर्णा नदीवर प्रगतीपथावर आहे .हा प्रकल्प केंद्र शासन पुरस्कृत बळीराजा जलसंजीवनी योजनेंतर्गत समाविष्ठ असुन मा. राज्यपाल महोदयांच्या सिंचन अनुशेष निर्मुलन कार्यक्रमांतर्गत समाविष्ट आहे. विदर्भातील खारपाण पट्टयातील, अवर्षण प्रवण व शेतकरी आत्महत्याग्रस्त क्षेत्रातील महत्वाकांक्षी मोठा प्रकल्प आहे.

प्रकल्पाचे एकूण सिंचन क्षेत्र ८७५४० हे. आहे. प्रकल्पीय एकूण पाणीसाठा ७३६.५०९ द.ल.घ.मी आहे. जलाशयाच्या सभोवताली असलेल्या १५ उपसा सिंचन योजनांव्दारे सिंचन प्रस्तावित आहे. प्रकल्पाची वितरण प्रणाली दाबयुक्त बंदीस्त नलिकेव्दारे (PDN) प्रस्तावित आहे. जिगांव प्रकल्पाच्या तृतीय सुप्रमा नुसार किंमत १३,८७४.५९ कोटी रुपयास दि. १९.०९.२०१९ रोजी मंजुरी प्रदान करण्यात आलेली असून माहे एप्रिल- २०२३ अखेर रु. ६,७५८.५० कोटी इतका खर्च झालेला आहे. प्रकल्पाची उर्वरीत किंमत रु. ८,८२६.९३ कोटी आहे.

प्रकल्पाचे एकूण बुडीत क्षेत्र १७०८७ हे असुन प्रथम टप्प्यातील ९९३६ हे पैकी ६१०७ हे. जमीन संपादीत झालेली आहे. उर्वरीत ३८२९ हे ची प्रकरणे भुसंपादनाच्या विविध टप्प्यावर प्रगतीपथावर आहेत. प्रकल्पाच्या बुडीत क्षेत्रात एकुण ३३ पुर्णत: व १४ अंशत: अशी एकुण ४७ गावे बाधित होत आहेत. प्रथम टप्प्यातील २५ गावांपैकी १८ गावांच्या नागरी सुविधेच्या कामे जिल्हा परिषदेला हस्तांतरणासह पुर्ण झालेली असुन उर्वरीत ७ गावांची कामे प्रगतीपथावर आहेत.

प्रकल्पाच्या धरण भिंतीची सांडव्यासह एकूण लांबी ८.२४ कि.मी आहे. सांडव्याची लांबी ४६९.५० मी. असून १५ x १२ मी. आकाराचे १६ वक्राकार व्दारे व १६ x २० मी. चे ६ वक्राकारव्दारे प्रस्तावित आहेत. सद्य:स्थितीत मंजुर टप्पानिहाय नियोजनानुसार नदीपात्रातील १६ x २० मी. आकाराचे ६ वक्रकारव्दाराच्या सांडव्याचे काम वगळता उर्वरीत माती धरणाचे व सांडव्याचे काम ९०% पूर्ण झालेले आहे. जलाशयाच्या सभोवताली असलेल्या एकुण १५ उपसा सिंचन योजनांपैकी १ ते १२ उपसा सिंचन योजनांची कामे हाती घेण्यात आलेली आहेत.

प्रकल्पाची बांधकामाची सद्य:स्थिती, प्रकल्पावर झालेली गुंतवणूक, दरवर्षी उपलब्ध होणारा निधी, पुनर्वसन व भुसंपादनाची व्याप्ती इ. सर्व बाबींचा विचार करुन प्रकल्पाचे लाभ काही प्रमाणात लवकर मिळण्यासाठी बांधकामाचे टप्पा निहाय नियोजन करणे आवश्यक होते .प्रकल्पात अंशत: पाणीसाठा करणेसाठी आवश्यक असणाऱ्या उपाययोजनांची कामे, आर्थिक व भौतिक नियोजन, तांत्रिक व आर्थिक व्यवहार्यता, प्रस्तावामुळे होणारी वाढ व बचत या बाबींचा अभ्यास करुन टप्पानिहाय नियोजन करण्यात आलेले आहे. त्याअनुषंगाने, जिगांव प्रकल्पाच्या टप्पानिहाय नियोजनास शासनाचे

पत्र क्र. संकीर्ण २०२१/ ४८२/ प्र.क्र. १५८/ मोप्र.२/ दि. २४.१.२०२२ अन्वये मंजुरी प्रदान करण्यात आलेली आहे.

प्रस्तावित कामाचा समावेश मंजुर प्रशासकीय मान्यता प्रस्तावामध्ये नसल्यास महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम संहितेच्या परिच्छेद क्र. १३४ मधील टीप क्र. २ मध्ये नमुद केल्याप्रमाणे "सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव सादर करण्यास विलंब होत असल्यास किंवा जेंव्हा प्रकल्पाच्या एक किंवा अधिक, पण सर्व घटक भागांवर नसेल असा अधिकचा खर्च ज्ञात असेल, तेंव्हा अधिक रक्कमेची टिपणी सक्षम प्राधिकरणास सादर करणे आवश्यक आहे." त्यास अनुंसरुन प्रस्तावित अधिक्य टिप्पणीस मंजूरीची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

मा.मंत्रीमंडळाच्या दि. ३० मे २०२३ रोजीच्या बैठकीत सदर प्रस्ताव विचारार्थ ठेवण्यात आला होता. राज्य तांत्रिक सल्लागार समितीचा अहवाल व वित्त व नियोजन विभागाने केलेल्या शिफारशीनुसार सविस्तर संकल्पन व प्रचलित दरसुची २०२२-२३ नुसार रु.१७१०.८४ कोटी अधिक्य टिपणीच्या प्रस्तावास मान्यता देण्याचा निर्णय मा.मंत्रीमंडळाने घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

जिगाव प्रकल्पाच्या (जलसंपदा व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०२२-२३ च्या दरसूची वर आधारीत) रु.१७१०.८४ कोटी अधिक्य टिपणीच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

प्रकल्पाची उपशिर्षनिहाय तरतुद खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | तपशील | प्रस्तावित किंमत (रु. कोटी) |
|---|---|---|
| १. | शीर्ष कामे (नदीपात्रातील सांडवा) | ८३७.६१ |
| २. | वक्राकार दरवाजे कामे | १२८.४३ |
| ३. | उ. सिं. यो. कार्यान्वित करण्याकरीता उपाययोजनेची कामे (पंप व अनुषंगिक) | ३३८.२८ |
| ४. | GST/Royalty/Etc | ४०६.५२ |
| | **एकूण रु.** | **१,७१०.८४** |

१. सदर प्रकल्पाच्या अधिक्य प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.
२. प्रकल्पाची अंमलबजावणी करतांना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.
३. उपलब्ध निधीचे Thin Spreading टाळणेचे दृष्टीने प्रकल्प घटकांच्या बांधकामावरील गुंतवणुकीचा प्राधान्य क्रम निश्चित करून त्यानुसारच कामे करावीत.
४. उच्च न्यायालयातील प्रलंबित जनहित याचिका तसेच विशेष चौकशी समितीच्या अनुषंगाने चालू किंवा प्रस्तावित चौकश्या व त्यानुंषगाने करावयाच्या कार्यवाहीवर या अधिक्य प्रस्ताव मान्यतेच्या निर्णयामुळे कोणतीही बाधा पोहचणार नाही.
५. प्रकल्प कार्यान्वित करण्यातील काही अनियमितता निदर्शनास आल्यास त्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांवर राहील.

६. पूर्ण झालेल्या घटक कामांचे घटक निहाय समाप्ती अहवाल तयार करुन सदर कामे तात्काळ व्यवस्थापनास हस्तांतरीत करावीत.

७. सदर अधिक्य प्रस्ताव मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यन्वित करण्याच्या विविध टप्प्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहीत धरता येणार नाही.

८. प्रकल्पासाठी आवश्यक वैधानिक मान्यता प्राप्त करून घेण्यात याव्यात.

९. शासनाने दि.०९.०३.२०१७ च्या पत्रान्वये आदेशित केल्यानुसार Technical Audit करण्यात यावे. Technical Audit चा अहवाल प्राप्त झाल्यानंतर आवश्यकतेनुसार जवाबदारी निश्चित करण्यात यावी.

१०.अधिक्य प्रस्ताव मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रीक बाबी अथवा निविदाविषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रीय अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही. तांत्रीक व निविदा विषयक प्रकरणांची तपासणी त्यावेळी प्रचलित शासन निर्णयानुसार करणे आवश्यक असून याची सर्वस्वी जबाबदारी महामंडळाची राहील.

**२.** या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-०५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च (८०), सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक (०४) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजनेअंतर्गत) जिगाव प्रकल्पाचे काम या खाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** सदर शासन निर्णय दिनांक ३० मे २०२३ रोजी झालेल्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयाचे अनुषंगाने निर्गमित करण्यात आला आहे.

**४.** या योजनेस प्रदान करण्यात आलेल्या मान्यतेची नोंद मोठे प्रकल्प-२ कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये सन २०२२-२३ अ.क्र. ०१ वर घेण्यात आली आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२३०७१०१७२३१४९६२७ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.07.10 17:25:05 +05'30'

**(अमोल फुंदे)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**सहपत्र : परिशिष्ट :- अ**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५) मा.विरोधीपक्षनेते,विधानसभा/विधानपरिषद,विधानमंडळ,महाराष्ट्रराज्य, मंत्रालय,मुंबई

६) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
८) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
९) महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक
१०) मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग, अमरावती
११) आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) अधिक्षक अभियंता, बुलडाणा पाटबंधारे प्रकल्प मंडळ,बुलडाणा
१३) जिल्हाधिकारी, बुलडाणा
१४) उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई-३२.
१५) अर्थ शाखा १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई-३२.
१६) निवड नस्ती- मोप्र-२ .

## परिशिष्ट-अ

शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/११९९ /प्र.क्र.३६९ /मोप्र-२, दिनांक १० जुलै, २०२३ चे सहपत्र जिगाव प्रकल्पाच्या अधिक्य प्रस्ताव मान्यतेच्या अंदाजपत्रकातील **उपशीर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा**

**(१) जिगाव पाटबंधारे प्रकल्प:**

| उपशिर्ष | मंजुर तृतीय सुप्रमा नुसार किंमत (रु. कोटी) (दरसुची २०१८-१९) | प्रकल्पाची अद्यावत किंमत (रु. कोटी) (दरसुची २०२२-२३) | मंजूर अधिक्य टिपणी किंमत (रु. कोटी) |
|---|---|---|---|
| **A) शीर्ष कामे** | | | |
| अ- प्राथमिक | ९.६५ | ९.६५ | ०.०० |
| ब- भूसंपादन | | | |
| i)भूसंपादन | ६०३४.९९ | ६०३४.९९ | ०.०० |
| ii) पुनर्वसन | ७२४.४५ | ७२४.४५ | ०.०० |
| सी- बांधकामे | १३९४.३१ | २६९८.४६ | १३०४.१५ |
| डी- विमोचके | ०.०० | ०.०० | ०.०० |
| के- इमारती | ३०.३६ | ३०.३६ | ०.०० |
| एम- वृक्षारोपण | ३.८५ | ३.८५ | ०.०० |
| ओ- किरकोळ कामे | २०.०३ | २०.०३ | ०.०० |
| पी- व्यवस्थापन | ८.८६ | ८.८६ | ०.०० |
| क्यु - हत्यारे व अवजारे | १.७४ | १.७४ | ०.०० |
| आर- दळणवळण | ८.७७ | ८.७७ | ०.०० |
| एक्स - पर्यावरण | १२५.८७ | १२५.८७ | ०.०० |
| एकुण (A) | ८३६२.८८ | ९६६७.०३ | १३०४.१५ |
| **(B) कालवा व वितरण व्यवस्था** | | | |
| अ- प्राथमिक | ३५.६१ | ३५.६१ | ०.०० |
| ब- भूसंपादन | १४९.६९ | १४९.६९ | ०.०० |
| क- कामे (अस्तरीकरण) | ०.०० | ०.०० | ०.०० |
| डी- रेग्युलेटर | ०.०० | ०.०० | ०.०० |
| इ- प्रपात | ०.०० | ०.०० | ०.०० |
| एफ - RHT कामे | २६.७६ | २६.७६ | ०.०० |
| जी- पुल | ०.०० | ०.०० | ०.०० |

| | | | |
|---|---|---|---|
| एच - एस्केप | ०.०० | ०.०० | ०.०० |
| के- इमारती | १८.८० | १८.८० | ०.०० |
| एल- मातीकाम | ०.०० | ०.०० | ०.०० |
| एम - वृक्षारोपण | १.५५ | १.५५ | ०.०० |
| ओ- किरकोळ कामे | ७८.६२ | ७८.६२ | ०.०० |
| पी- व्यवस्थापन | १९.६६ | १९.६६ | ०.०० |
| क्यु - हत्यारे व अवजारे | १.०० | १.०० | ०.०० |
| आर- दळणवळण | ४७.६२ | ४७.६२ | ०.०० |
| स्थापत्य कामे | २४८.०७ | ३५९.६९ | १११.६२ |
| उर्ध्वगामी नलिका | ११५६.८६ | १३६५.५९ | २०८.७३ |
| यांत्रिकी कामे | २६१.६६ | ३१३.४२ | ५१.७६ |
| विद्युत कामे | २९९.५९ | ३३४.१७ | ३४.५८ |
| तृतीय वितरीका | २५८८.३५ | २५८८.३५ | ०.०० |
| एकुण (B) | ४९३३.८४ | ५३४०.५३ | ४०६.६९ |
| एकुण बांधकाम (A+B) | १३२९६.७२ | १५००७.५६ | १७१०.८४ |
| इटीपी चार्जेस | ५७७.८७ | ५७७.८७ | ०.०० |
| **एकुण किंमत** | **१३८७४.५९** | **१५५८५.४३** | **१७१०.८४** |

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.07.10 17:25:34 +05'30'

(अमोल फुंदे)
उप सचिव,महाराष्ट्र शासन